मौजे येळापूर व इतर ९ गावे ,ता. शिराळा, जि. सांगली येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो-२२१६/प्र.क्र. ११२/पापु-१७**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः १४ ऑगस्ट,२०१७**

**वाचा -**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक किमका-१०९८/सीआर-४३७-अ/ पापु-१०, दिनांक २/४/१९९८.
२) शासन पत्र क्रमांक पापुयो-२२११/प्र.क्र. १०९/पापु-१७,दिनांक २१/६/२०११.
३) राज्य स्तरीय छोट्या गटाच्या दिनांक २९/६/२०१२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुणे प्रादेशिक विभाग, पुणे यांची तांत्रिक मान्यता बाब क्र. १०, मे-२०१२.
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुणे प्रादेशिक विभाग, पुणे यांचे क्र. मु.अ.(पुणे)/तांशा-१/येळापूर/१३४५, दिनांक १/७/२०१६.
६) शासन पत्र क्रमांक पापुयो-२२१७/प्र.क्र. ६२/पापु-१७, दिनांक २०/७/२०१७.

**प्रस्तावना**

**मौजे येळापूर व इतर ९ गावे,ता. शिराळा, जि. सांगली येथील** नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ३,६४,३५,०००/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सदर योजनेच्या मूळ किंमतीच्या ५**%** अतिरिक्त खर्च करण्यास मान्यता देण्यात आली.

तथापी, योजनेची जादा दराची निविदा स्विकारल्याने तसेच अन्य अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या कामात वाढ झाली असल्याने योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यानुसार, दिनांक २९/६/२०१२ रोजीच्या छोट्या गटाच्या बैठकीत सदर योजनेचा सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्याचे समितीने निर्देश दिले आहेत. त्यानुसार, मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण **पुणे प्रादेशिक विभाग, पुणे** यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.४१७.७९ लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली असून संदर्भ क्र. ५ अन्वये प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित

प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. तथापि, सदर योजनेच्या जादा दराच्या निविदा स्विकारल्यामुळे, सदर निविदांना संदर्भ क्र. ६ अन्वये कार्योत्तर मंजूरी देण्यात आली आहे.

दरम्यानच्या, कालावधीत सदर प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेतील गावांनी स्वतंत्र पाणी पुरवठा योजनेची मागणी केल्यामुळे, प्रादेशिक योजनेतील उपांगे संबंधीत गावाच्या स्वतंत्र योजनेसाठी वापरण्यात आली असल्याचे प्रस्तावात नमूद केले आहे. सद्य:स्थितीत सदरहू प्रादेशिक पाणी पुरवठा योजना बंद असल्याचेही नमूद केले आहे. तसेच सदर योजनेवर अंदाजपत्रकीय तरतूदीनुसार खर्च करण्यात आला असल्यामुळे प्रस्तुत योजनेच्या सुधारीत आराखड्यास व अंदाजपत्रकास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव सादर केला आहे, त्यानुसार सदरहु प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**मौजे येळापूर व इतर ९ गावे,ता. शिराळा, जि. सांगली** येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रुपये ४,१७,३९,४४०/- (ढोबळ)** (**अक्षरी रुपये चार कोटी सतरा लक्ष एकोणचाळीस हजार चारशे चाळीस फक्त**) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
२. सदर योजना सुधारीत करण्याबाबत समाविष्ट गावांचा ठराव प्राप्त न करताच, प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. तरी सदर प्रकरणी संबंधीताविरुद्ध सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी कार्यवाही करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.
३. योजनेत समाविष्ट असलेल्या गावांनी स्वतंत्र पाणी पुरवठा योजनेची मागणी केल्यानुसार सद्य:स्थितीत स्वतंत्र योजनेतुन पाणी पुरवठा होत असल्याची खात्री सदस्य (तांत्रिक) यांनी करावी.
४. सदर प्रादेशिक योजनेतील सर्व उपांगे संबंधित गावांच्या स्वतंत्र नळपाणी पुरवठा योजनेसाठी वापरण्यात आली असल्याचे प्रस्तावात नमूद केले आहे. तरी सदर उपांगे वापरली आहेत किंवा नाहीत याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,सांगली यांनी सदस्य

(तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेसमवेत संयुक्तीक पाहणी करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर प्रादेशिक योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकानुसार उपांगांवर खर्च करण्यात आला आहे किंवा कसे याबाबत सदस्य (तांत्रिक) यांच्या स्तरावर तपासणी करुन त्यांची देयके अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

६. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही तसेच योजनेचे लेखे बंद करणे याची सर्वस्वी जबाबदारी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे यांची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.५३,४४,४३०/- (अक्षरी रुपये त्रेपन्न लक्ष चव्वेचाळीस हजार चारशे तीस फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्याच्या हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उप विभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१४११४९४५६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyaneshwar M Jawale

Digitally signed by Dnyaneshwar M Jawale
DN: CN = Dnyaneshwar M Jawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.08.14 12:23:20 +05'30'

**( ज्ञा.म्हा.जावळे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

२) विरोधी पक्ष नेता, विधान सभा/विधान परिषद, विधान मंडळ, मुंबई.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
६) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
७) जिल्हाधिकारी, सांगली.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सांगली.
९) सदस्य (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली.
१३) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे.
१५) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सांगली.
१५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सांगली.
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,सांगली.
१७) अप्पर मख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१७,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवड नस्ती कार्यासन पापु-१७.